**कवंठेमहंकाळ, जि.सांगली येथे जिल्हा परिषदेच्या मालकीचा भूखंड खाजगीकरणाच्या माध्यमातून विकसित करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय, क्रमांक संकुल २००९/प्र.क्र.९६/पंरा-७
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ३१ ऑगस्ट,२००९

**संदर्भ** :- १.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.संकुल-२००७/प्र.क्र.१९९/पंरा-७,दि.१.९.२००८
२.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.संकुल-२००४/प्र.क्र.५४/पंरा-८,दि.३०.४.२००४
३. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,सांगली यांचे पत्र क्र.बांधकाम/प्रकल्प/०२/२०५९/१/०९, दिनांक ३०.६.२००९
४. मे.पारीख ॲन्ड असोशिएटस, सांगली, यांचा दिनांक-७.११.२००७ चा सुसाध्यता अहवाल

**प्रस्तावना** :-

जिल्हा परिषदेच्या उत्पन्नात वाढ होण्याच्या दृष्टीने संदर्भीय दिनांक ३०.४.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सांगली जिल्हा परिषदेने कवंठेमहंकाळ, जिल्हा-सांगली येथील जिल्हा परिषदेच्या सि.स.नं.१६३२ मधील एकूण ३५२७.४० चौ.मी. क्षेत्रफळाचा भूखंड खाजगीकरणाच्या माध्यमातून विकसित करण्याचा निर्णय दिनांक २८.११.२००५ च्या ठरावान्वये घेतला आहे. याकरीता सांगली जिल्हा परिषदेने संदर्भीय शासन निर्णयातील तरतूदीनुसार प्रस्तुत प्रकल्पाकरीता मे.पारीख ॲन्ड असोशिएटस, सांगली यांची विहीत कार्यपध्दतीनुसार प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्ती केली होती. सदर प्रकल्प सल्लागाराने या प्रकरणी दिनांक ७.११.२००७ च्या पत्रान्वये सांगली जिल्हा परिषदेला सुसाध्यता अहवाल सादर केला होता. प्रकल्प सल्लागाराच्या सल्ल्यानुसार जिल्हा परिषदेने प्रकल्प राबविण्यासाठी दिनांक २३.२.२००८ रोजी मागविलेल्या जाहिर निविदेमध्ये, श्री. किशोर के. शहा, सांगली यांची निविदा सरस आढळून आली होती. सांगली जिल्हा परिषदेच्या बीओटी प्रकल्प समितीने सदर विकासकाशी दिनांक २३.६.२००८ रोजी केलेल्या वाटाघाटीनुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., सांगली यांनी संदर्भीय दिनांक ३०.६.२००९ च्या पत्रान्वये सादर केलेला सविस्तर प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** :-

१. कवंठेमहंकाळ, जि.सांगली येथील जिल्हा परिषदेच्या सि.स.नं.१६३२ मधील एकूण ३५२७.४० चौ. मी. क्षेत्रफळाचा भूखंड, त्यावरील अस्तित्वातील दवाखान्याच्या व निवासस्थानाच्या जीर्ण झालेल्या व मोडकळीस आलेल्या इमारतीचे बांधकाम पाडून, सदर भूखंड विकसित करण्याच्या एकूण रु.२७५.०० लक्ष प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तावित प्रकल्पाकरीता जिल्हा परिषदेने मागविलेल्या जाहीर स्पर्धात्मक निविदेद्वारे विहीत तांत्रिक व आर्थिक निकषात वाटाघाटीअंती पात्र ठरलेल्या, श्री.किशोर के.शहा, जि.सांगली या विकासकाच्या प्रकल्प निविदेस दिनांक १.९.२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-(६) नुसार खालील अटींच्या अधिन राहून, शासन मान्यता देण्यात येत आहे.:-

**i.** संदर्भीय दिनांक १.९.२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-(४) (i) (इ) मधील तरतूदीनुसार जिल्हा परिषदेचा सि.स.नं.१६३२ मधील एकूण ३५२७.४० चौ.मी. क्षेत्रफळाचा भूखंड संबधित विकासकाला प्रथम ३० वर्षासाठी रु.१००/-प्रति चौ.मी., प्रति वर्ष प्रमाणे भाडेपट्ट्यावर देण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानंतर विकासकाकडून करारातील अटी/शर्तीचा भंग झाला आहे किंवा कसे हे तपासून, विकासकाबरोबर करावयाच्या करारनाम्याचे ३० वर्षांनी जास्तीत जास्त ९९ वर्षापर्यंत त्या-त्या वेळी महसूल व वन विभागाच्या धोरणाप्रमाणे नुतनीकरण वाढविता येईल. सदर भाडेपट्ट्याचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण प्रकल्पा हा जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करणे संबधित विकासकावर बंधनकारक राहील.

**ii.** प्रस्तुत प्रकल्पासाठी जिल्हाधिकारी, सांगली यांच्या ना-हरकत प्रमाणपत्राची आवश्यकता तपासण्यात यावी.

**iii.** विकासकाने वरील भूखंडावर निविदा अटीनुसार पहिल्या मजल्यावर एकूण १००.०० चौ.मी. क्षेत्रफळ असलेले कार्यालय शासनास विनामुल्य बांधून द्यावे. तसेच विकासकाने वाटाघाटीमध्ये मान्य केल्यानुसार सांगली जिल्हा परिषदेस रु.२२.०० लक्ष (अक्षरी रु.बावीस लक्ष फक्त) प्रिमिअम अदा करावा.

**iv.** प्रस्तुत प्रकल्पाचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी प्रकल्प सलागार यांच्या दिनांक ७.११.२००७ च्या सुसाध्यता अहवालीतील अटी-शर्तींची पूर्तता करण्यात यावी.

**v.** सदर प्रकल्पासाठी आवश्यक त्या सर्व कायदेशीर बाबींची पूर्तता करणे विकासकावर बंधनकारक राहील. तसेच प्रकल्पासाठी स्थानिक विकास प्राधिकरण / महानगरपालिका/ शासकीय/ निम-शासकीय कार्यालयाकडून परवानगी/ ना-हरकत दाखले घेण्याची व त्यांचे नियमाचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी विकासकाची राहील.

**vi.** विकासकाने बांधून भाडे तत्वावर दयावयाच्या बांधकामाची देखभाल व दुरुस्ती, पाणीपुरवठा, वीज देयके व अनुषंगिक सर्व कर इत्यादी खर्चाची संपूर्ण जबाबदारी विकासकाची राहील, अशी अट विकासकाबरोबर करावयाच्या करारनाम्यात अंतर्भूत करावी.

**vii.** संपूर्ण प्रकल्प विहीत कालावधीतच पूर्ण करण्याचे बंधन विकासकावर राहील.

**viii.** शासकीय इमारतींचे बांधकाम विहीत प्रतीचे व योग्य त्या गुणवत्तेचे राहील, ही अट विकासकावर बंधनकारक करण्यात यावी.

**ix.** विकासकाने घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीची कोणतीही हमी जिल्हा परिषद वा शासन घेणार नाही.

**x.** भविष्यात शासनाच्या नियमात किंवा स्थानिक प्राधिकरणाच्या शहर विकास नियंत्रक नियमावलीत काही बदल/ सुधारणा झाल्यामुळे जर या भूखंडावर अनुज्ञेय क्षेत्रफळ/बांधकाम वाढ झाल्यास अनुज्ञेय वाढीव बांधकामावर पूर्ण हक्क शासनाचा राहील, अशा आशयाची अट करारपत्रात समाविष्ट करण्यात यावी.

**xi.** संदर्भीय दिनांक १.९.२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-(१०) (क) नुसार प्रस्तुत प्रकल्पाकरीता संबधित विकासकाबरोबर तसेच विकासक व गाळे- भाडेधारक यांचेशी करण्यात येणाऱ्या करारामध्ये लवादाची अट समाविष्ट करण्याची दक्षता घ्यावी.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.२००९०८३११४०५५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह.वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री, ग्राम विकास व पर्यटन यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री,ग्राम विकास यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल-१/२(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली.
कार्यकारी अभियंता (बांध.),जिल्हा परिषद, सांगली.